“महाराष्ट्र शिकाऊ उमेदवारी प्रोत्साहन योजनासाठीच्या नवीन लेखाशिर्ष व संगणक सांकेतांक मान्यता देणेबाबत”

# महाराष्ट्र शासन

## कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग

**शासन निर्णय क्रमांक :- आयटीआय-२०२०/प्र.क्र.२५८/व्यशि-३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- २५ ऑक्टोबर, २०२१

**वाचा :- आयटीआय-२०२०/प्र.क्र.१२७/व्यशि-३ दिनांक ०३.०६.२०२१**

**प्रस्तावना :-**

औद्योगिक आस्थापनांमध्ये उपलब्ध असलेल्या पायाभूत सुविधांचा उपयोग करुन कुशल कारागीरास आवश्यक असलेले प्रशिक्षण देण्यासाठी शिकाऊ उमेदवारी कायदा,१९६१ अन्वये शिकाऊ उमेदवारी प्रशिक्षण योजना केंद्र सरकारच्या कौशल्य विकास व उद्योजकता मंत्रालयाच्या नियंत्रणाखाली राज्यात राबविण्यात येत आहे. या योजनेची अंमलबजावणी करण्यासाठी महाराष्ट्र राज्याकरिता शिकाऊ उमेदवारी कायदा,१९६१ मध्ये सुधारणा करण्यासाठी महाराष्ट्र शिकाऊ उमेदवारी कायदा, २०१८ अस्तित्वात आलेला आहे. राज्याकरिता कायद्यामध्ये केलेल्या सुधारणेनुसार ३० व त्यापेक्षा जास्त मनुष्यबळ (कंत्राटी कर्मचाऱ्यांसह) असलेल्या आस्थापनेतील एकूण मनुष्यबळाच्या किमान २.५% ते कमाल २५% शिकाऊ उमेदवारीच्या जागा स्थित करणे बंधनकारक आहे. शिकाऊ उमेदवारीचा कालावधी व्यवसायनिहाय ६ ते ३६ महिने आहे. शिकाऊ उमेदवारी प्रशिक्षण योजनेअंतर्गत प्रशिक्षित (Trained) तसेच अप्रशिक्षित (Fresher) उमेदवारांना प्रशिक्षण दिले जाते.

राज्यातील बेरोजगार उमेदवारांच्या संख्येचा विचार करता राज्यातील शिकाऊ उमेदवारी योजनेची व्याप्ती वाढविणे क्रमप्राप्त आहे. त्यामुळे शासकीय, निमशासकीय आणि खाजगी आस्थापनांमध्ये शिकाऊ उमेदवारी प्रशिक्षण योजनेअंतर्गत शिकाऊ उमेदवारांची भरती वाढविण्यासाठी प्रोत्साहीत करण्याच्या दृष्टीने शिकाऊ उमेदवारी प्रशिक्षण योजनेस पूरक अशी **“महाराष्ट्र शिकाऊ उमेदवारी प्रोत्साहन योजना”** सुरु करण्यास शासनाच्या संदर्भाधिन शासननिर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. सदर योजनेंतर्गत प्रतिवर्ष १ लाख उमेदवारांना प्रशिक्षित करण्याचे उद्दिष्ट आहे.

सदर योजनेकरीताचा निधी अर्थसंकल्पित करण्यासाठी नवीन लेखाशिर्ष व संगणक सांकेतांक देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

शासकीय, निमशासकीय आणि खाजगी आस्थापनांमध्ये शिकाऊ उमेदवारी प्रशिक्षण योजनेअंतर्गत शिकाऊ उमेदवारांची भरती वाढवून प्रोत्साहीत करण्यासाठी “महाराष्ट्र शिकाऊ

उमेदवारी प्रोत्साहन योजनेस (Maharashtra Apprenticeship Promotion Scheme-MAPS)" दिनांक ०३ जून, २०२१ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. सदर योजनेसाठी निधी अर्थसंकल्पित करण्यासाठी तसेच शिकाऊ उमेदवारांच्या विद्यावेतनावर होणारा खर्च भागविण्यासाठी आवश्यक असलेले नवीन लेखाशिर्ष व संगणक सांकेतांक मंजूर करण्यात आलेला आहे. सदर योजनेचे लेखाशिर्ष खालिलप्रमाणे आहे.

| | | |
|---|---|---|
| मागणी क्र. | झेडए-२ | |
| मुख्य लेखाशीर्ष | २२३० | कामगार व सेवायोजन |
| उप मुख्य लेखाशीर्ष | ०३ | प्रशिक्षण |
| गौण शीर्ष | १०२ | शिकाऊ उमेदवारी प्रशिक्षण |
| गटशीर्ष | (०१) | शिकाऊ उमेदवारी प्रशिक्षण |
| उप गट शीर्ष | (०१)<br>(०२) | महाराष्ट्र शिकाऊ उमेदवारी प्रोत्साहन योजना (कार्यक्रम) |

तसेच प्रधानशिर्ष २२३० अंतर्गत १०२ या गौणशिर्षाखाली २२३०ए७१९ असा आठ अंकि सांकेतांक आहे.

सदर शासन निर्णय महालेखापाल कार्यालय (लेखा व हकदारी) - I, महाराष्ट्र,मुंबई यांच्या क्र. सं:ख.वि/चा-१/कौशल्य विकास व उद्योजकता विभाग/युओआर-६८/२०२०-२१/३५५ दिनांक २४.०९.२०२१ व वित्त विभाग यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२११०२५१७२५०६५९०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vinod S Bondre

Digitally signed by Vinod S Bondre
DN: c=IN, o=Maharashtra State Innovation Society, ou=eOffice, postalCode=400021, st=Maharashtra, 2.5.4.20=ee1740f2ea3726733cb0290a1d22b5ae7c4c794d1d0e095d5373b541c99dcb68, serialNumber=c313a8b86d67716d182c41d1e22f57d99c8ee5f4654a216d8fe23b5ad24ed271, cn=Vinod S Bondre
Date: 2021.10.25 17:31:32 +05'30'

**( विनोद बोंदरे )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
२. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई
४. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षणसंचालनालय महाराष्ट्र राज्य, मुंबई
५. सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मुंबई/पुणे/नाशिक/औरंबाद/अमरावती/नागपूर
६. सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय,मुंबई/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर

७. जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी, जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण कार्यालय (सर्व)
८. महालेखापाल ( लेखा वअनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई,
९. महालेखापाल ( लेखा वअनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर,
१०. महालेखापाल ( लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई,
११. महालेखापाल ( लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर,
१२. अधिदान व लेखा अधिकारी ,मुंबई,
१३. निवासी व लेखा परीक्षा अधिकारी ,मुंबई,
१४. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय (सर्व)
१५. उप सचिव, कौशल्य विकास, रोजगार आणि उद्योजकता विभाग,मंत्रालय, मुंबई
१६. निवड नस्ती. (व्यशि-३)